निर्लेखित वाहनांच्या ऐवजी नविन वाहन खरेदी करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वाहन -२०१५/प्र.क्र. २७ /आरोग्य-४

जी.टी.हॉस्पिटल संकुल इमारत,मंत्रालय,मुंबई
तारीख: ३ मार्च, २०१५

वाचा

**१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वाहन२०१४/प्र.क्र.९/१४/विनियम, दि.८मे,२०१४ व ४ ऑगस्ट,२०१४ व शुध्दीपत्रक दि.७ ऑगस्ट,२०१४.**

**२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.वाहन-२०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम, दि.२२ ऑगस्ट,२०१४.**

**३) संचालक आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र दि.२१/०१/२०१५.**

**४) कार्यकारी अभियंता (व्हे.डेपो), महानगरपालिका, पुणे यांचे कार्यालयीन आदेश क्र.३४३८ दि.३/०१/२०१२.**

प्रस्तावना

उपसंचालक (परिवहन), पुणे यांच्याकडील खालील तक्त्यात नमुद करण्यात आलेल्या संदर्भाधीन क्र.४ येथील आदेशान्वये निर्लेखित वाहनांऐवजी मा.मंत्री (सा.आ.वि) यांचेकरिता वाहन खरेदी करण्याचा उपसंचालक (परिवहन), पुणे यांचा प्रस्ताव प्राप्त झाला असून सदर निर्लेखित वाहना संबंधीत माहिती खालील प्रमाणे आहे.:-

| अ.क्र. | मॉडेल | वाहन क्रमांक | वापर कालावधी | निर्लेखित केल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १. | प्रिमीयर | MH-12-W-4700 | १६ वर्षे | ०३/०१/२०१२ |
| २. | मारूती जिप्सी | MH-24-A7103 | १६ वर्षे | ०३/०१/२०१२ |
| ३. | टेम्पो ट्रॅक्स | MH-12-AH-6002 | १२ वर्षे | ०३/०१/०२०१२ |

शासकीय व इतर कार्यालयांमध्ये वाहनांच्या वापरासंबधी निर्लेखित वाहनाऐवजी नवीन वाहनांच्या खरेदीबाबतची प्रक्रिया सुलभ होण्याचा दृष्टीकोनातून शासनाने शासन निर्णय,वित्त विभाग क्र.वाहन-२०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम, दि.२२ ऑगस्ट, २०१४ अन्वये मंजुरी दिली आहे.सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद २ नुसार प्रशासकीय विभांगाना सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून दि.३१ मार्च,२०१५ पर्यंत राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेशिवाय निर्लेखित वाहनांच्या एकूण संख्येच्या ७५% मर्यादेपर्यंत नवीन वाहने खरेदी करण्यास परवानगी देण्यात आली असून सदर खरेदीस प्रशासकीय विभागाच्या स्तरावरुनच मान्यता दयावयाची आहे. सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद ७

अनुसार असे स्पष्ट करण्यात आले आहे की वाहन अनुज्ञेय असणा-या अधिका-यांच्या वापरातील ज्या प्रकारचे वाहन (जीप/कार) निर्लेखित करण्यात आले असेल त्या वाहनाऐवजी संबधीत पदासाठी त्याच प्रकारचे वाहन दि.८ मे,२०१४ व ४ ऑगस्ट,२०१४ च्या शासन निर्णय व दि.७ ऑगस्ट,२०४ च्या शुध्दीपत्रकान्वेय अनुज्ञेय किंमत मर्यादेत खरेदी करता येईल. वरील परिस्थितीत उक्त तक्त्यात नमुद निर्लेखित वाहनां ऐवजी मे.टोयाटो किर्लोस्कर मोटार प्रायव्हेट लिमीटेड या वाहन उत्पादक कंपनीचे इनोव्हा हे वाहन खरेदी करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

वित्त विभागाच्या दिनांक ८ मे,२०१४ च्या शासन निर्णयानुसार मा.मंत्री (आरोग्य) महोदयांकरिता रु.२० लक्ष मर्यादेत उक्त तक्त्यात नमुद निर्लेखित वाहनां ऐवजी मे.टोयाटो किर्लोस्कर मोटार प्रायव्हेट लिमीटेड या वाहन उत्पादक कंपनीचे खालील तक्त्यात नमुद केलेले वाहन खरेदी करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | रक्कम |
|---|---|---|
| | इनोव्हा (युरो-४) | |
| १. | वाहनाचा विशेष सरकारी दर | १४,६७,५५५/- |
| २. | स्थानिक संस्था कर | ७०,३५४/- |
| ३. | विमा | ६०२४१/- |
| ४. | इतर संकीर्ण शुल्क | ६७००/- |
| ५. | सहाय्यभुत साहित्य | १२,२९५/- |
| | एकुण | १६,१७,१४५/- |

सदर मंजुरी खालील प्रमाणे अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) वाहन चालकाचे पद मंजूर/उपलब्ध आहे व त्यासाठी कोणत्याही परिस्थितीत वाहन चालकाचे नवीन पद निर्माण करता येणार नाही.

२) सदर वाहन खरेदी बाबतची कार्यवाही उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे या कार्यालयाने करावी.

३) वाहनाची विशेष सरकारी दराची रक्कम मे.टोयोटा किर्लोस्कर मोटर प्रायव्हेट लिमिटेड यांचे नाव बेंगलोर येथे देय असलेल्या धनाकर्षाव्दारे अदा करण्यात यावी. स्थानिक संस्था कराची रक्कम पुणे महानगर पालिकेस अदा करण्यात यावी. विम्याची रक्कम विमा कंपनीस अदा करण्यात यावी. इतर संकीर्ण शुल्क व सहाय्यभुत साहित्याची रक्कम मे.टोयोटा किर्लोस्कर मोटर प्रायव्हेट लिमिटेड या कंपनीचे स्थानिक अधिकृत विक्रेते मे.डिएसके टोयोटा, डिएसके मोटर्स लिमिटेड, पुणे यांना अदा करण्यात यावी.

२. यावरील खर्च सन २०१४-२०१५ साठी खालील नमूद केलेल्या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदाना मधून भागविण्यात यावा.

**मागणी क्र.आर-३**

| | | |
|---|---|---|
| " ४२१० | - | वैदयकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यांवरील भांडवली खर्च, |
| ०१ | - | नागरी आरोग्य सेवा |
| (०१) ( ०४) | - | मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने (४२१० ११०१) |
| ५१ | - | मोटार वाहने " |

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. वाहन-२०१४/प्र.क्र.३६/१४/विनियम, दि.२२ ऑगस्ट, २०१४ अनुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०३१२४८०२७६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.03 16:09:04 +05'30'

**संजय कमलाकर**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक आरोग्य सेवा,मुंबई
२. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे
३. सहसंचालक,आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), पुणे
४. सहाय्यक संचालक (लेखा व लेखापरिक्षा), आरोग्य सेवा,पुणे
५. महालेखापाल १- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
६. महालेखापाल १- (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

९. वित्त विभाग(व्यय-१३),मंत्रालय, मुंबई.

१०.अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई.

११.निवडनस्ती (आरोग्य-४)